बृहन्मुंबईतील ओव्हल मैदान, क्रॉस मैदान व
आझाद मैदानांचे सेंट्रल पार्कमध्ये रुपांतर
करण्याबाबत अहवाल तयार करण्यासाठी
'अभ्यास गट ' गठीत करण्याबाबत ....

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्र.मुंविप्र-२००९/प्र.क्र. ८४ /विप्र
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दि.३० ऑक्टोबर, २००९.

**प्रस्तावना -**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली बृहन्मुंबई विकासाशी संबंधित शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२७/०७/२००९ रोजीच्या बैठकीमध्ये अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका यांनी बृहन्मुंबईतील ओव्हल मैदान, क्रॉस मैदान व आझाद मैदानांचे सेंट्रल पार्कमध्ये रुपांतर करण्याचा प्रस्ताव विचारार्थ सादर केला होता. या संदर्भात शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या चर्चेनुसार उपरोक्त मैदानांचे सेंट्रल पार्कमध्ये रुपांतर करण्याच्या महानगर पालिकेच्या प्रस्तावासंदर्भात तपशिलवार अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी एक 'अभ्यास गट' गठीत करण्याबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

२. बृहन्मुंबईतील ओव्हल मैदान, क्रॉस मैदान व आझाद मैदानांचे सेंट्रल पार्कमध्ये रुपांतर करण्याबाबतच्या बृहन्मुंबई महानगर पालिकेने तयार केलेल्या प्रस्तावाचा तपशिलवार अभ्यास करुन तत्संबंधीचा अहवाल शासनास सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे अभ्यास गट स्थापन करण्याबाबत शासन मान्यता देत आहे. -

| | |
|---|---|
| १. सचिव(क्रीडा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | - अध्यक्ष |
| २. सचिव(विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग | - सदस्य |
| ३. अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका | - सदस्य तथा निमंत्रक |
| ४. सह पोलीस आयुक्त (वाहतुक), मुंबई | - सदस्य |
| ५. बृहन्मुंबई महानगर पालिकेशी संबंधित हेरीटेज कॉन्झर्वेशन कमिटीमार्फत नामनिर्देशीत प्रतिनिधी | - सदस्य |
| ६. श्री. नरिंदर नायर, अध्यक्ष, बॉम्बे फर्स्ट , मुंबई. | - सदस्य |

२. उपरोक्त कोअर ग्रुपने आपला अहवाल दि.३१/०१/२०१० पर्यंत शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक संकेतांक २००९११०३१७३२२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रा. तु. जाधव)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय , मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय , मुंबई.
मा. राज्यमंत्री, सामान्य प्रशासन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय , मुंबई.
सचिव(क्रीडा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय , मुंबई.
सचिव(विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय , मुंबई.
आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई
अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई
सह पोलीस आयुक्त (वाहतुक), मुंबई
अध्यक्ष, बृहन्मुंबई महानगर पालिकेशी संबंधित हेरीटेज कॉन्झर्वेशन समिती, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई
श्री. नरिंदर नायर, अध्यक्ष, बॉम्बे फर्स्ट, मुंबई
निवड नस्ती / विप्र

***